२०२००६०३१०२३४७६०१९

# महाराष्ट्र शासन

क्रमांक आव्यप्र-२०२०/प्र.क्र१२/आव्यप्र-१
आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक २ जून २०२०

विषय:- निसर्ग चक्रीवादळास तोंड देण्यासाठी उपाययोजना.

**शासन परिपत्रक:-**

भारतीय हवामान विभागाने वर्तविलेल्या अंदाजानुसार अरबी समुद्रामध्ये निर्माण झालेले निसर्ग चक्रीवादळ महाराष्ट्राच्या दिशेने येत आहे. सदर चक्रीवादळ दिनांक ३ जून २०२० रोजी रायगड जिल्हयात अलिबाग जवळ किनारपट्टीवर धडकणार आहे.

निसर्ग चक्रीवादळास तोंड देण्यासाठी राज्य शासनाकडून आवश्यक उपाययोजना करण्यात आलेल्या आहेत. या चक्रीवादळाच्या परिणामामुळे मुंबईसह कोकण किनारपट्टीवरील रायगड, ठाणे व पालघर जिल्हयात तसेच उत्तर मध्य महाराष्ट्रात वादळी वा-यासह मुसळधार पाऊस होण्याची शक्यता आहे. वादळाच्या पार्श्वभूमीवर प्रशासनाकडून किनारपट्टीवरील असुरक्षित तसेच कच्या घरातील नागरीकांना सुरक्षित स्थळी हलविण्याची कार्यवाही करण्यात आली आहे. नागरीकांच्या स्थलांतरणासाठी आवश्यकता भासल्यास आपत्ती व्यवस्थापन अधिनियम २००५ च्या तरतूदींचा वापर करण्यात यावा.

नागरीकांना आवाहन करण्यात येते की, चक्रीवादळाचा धोका लक्षात घेता दिनांक ३ व ४ जून २०२० रोजी नागरीकांनी निकडीचे नसल्यास घराबाहेर पडू नये. राज्य शासनाच्या सर्व अत्यावश्यक सेवा नेहमीप्रमाणे सुरू राहतील. स्थानिक प्रशासनाने या परिपत्रकाच्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

किशोर राजे निंबाळकर

(किशोर राजे निंबाळकर)
सचिव
आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन

(कृ.मा.प.)

**प्रत:-**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य , मुंबई.

२) आयुक्त, मुंबई महानगरपालिका, मुंबई.
३) विभागीय आयुक्त, (कोकण विभाग/ पुणे विभाग/ नाशिक विभाग)
४) पोलीस आयुक्त, मुंबई.
५) जिल्हाधिकारी (रायगड, ठाणे, पालघर, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, मुंबई शहर, मुंबई उपनगर, पुणे, अहमदनगर, नाशिक, धुळे, नंदुरबार)
६) आयुक्त, (मुंबई/ पुणे महानगर विकास प्राधिकरण क्षेत्रातील सर्व महानगरपालिका).
७) निवडनस्ती.